प्रादेशिक पर्यटन विकास योजना सन २०२१-२२ अंतर्गत महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाच्या नवीन कामांना प्रशासकीय मान्यता देऊन निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टिडीएस २०२२/०३/प्र.क्र.२०६/पर्यटन,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ३० मार्च, २०२२.

संदर्भ :-
१) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.टिडीएस २०१०/०८/ प्र.क्र.४६३/पर्यटन, दि.०४.११.२०१०.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०२२/प्र.क्र. २५/ २०२२ /कोषा / प्रशा-५, दिनांक १६.०३.२०२२

**शासन निर्णय :**

पर्यटनस्थळांच्या ठिकाणी पायाभूत सुविधा पुरविण्यासाठी प्रादेशिक पर्यटन योजनेंतर्गत सन २०२१-२२ मध्ये खालील तक्त्यामध्ये नमूद केलेल्या महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाच्या नवीन कामांसाठी रुपये **५९३४.७०** लक्ष एवढ्या रकमेस प्रशासकीय मान्यता देऊन सदर कामांसाठी स्तंभ क्रमांक ४ येथे नमूद केल्याप्रमाणे एकूण रुपये **१७८०.४१** लक्ष (अक्षरी रुपये सतरा कोटी ऐंशी लक्ष ऐकेचाळीस हजार फक्त) एवढा निधी सन २०२१-२२ मध्ये महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास वितरीत करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये लक्षात)

| अ.क्र. | कामे | अंदाजित रक्कम | सन २०२१-२२ मध्ये वितरीत रक्कम |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १) बुलढाणा | | | |
| १ | शेगाव, जि. बुलढाणा यात्री निवासाचे श्रेणीवाढ करणे | ४९७.२६ | १४९.२० |
| २ | लोणार, जि बुलढाणा येथील म.प.वि. महामंडळाच्या पर्यटक निवासाचे श्रेणीवाढ करणे | १९३.७२ | ५८.१२ |
| | | | |
| २) सातारा | शिखर शिंगणापूर येथे पर्यटक निवास उभारणे | ४९३.९६ | १४८.२० |
| | | | |
| ३) ठाणे | पर्यटक निवास टिटवाळा, ठाणे येथे पर्यटक निवास उभारणे | ४९८.९६ | १४९.७० |
| | | | |

| | | | |
|---|---|---|---|
| **४) वर्धा** | पर्यटक निवास, वर्धा येथील पर्यटक निवासाचे श्रेणीवाढ करणे | ४९९.९६ | १५०.०० |
| | | | |
| **५) यवतमाळ** | टिपेश्वर, जि यवतमाळ येथे अतिरिक्त पर्यटन सुविधा तयार करणे | ४९९.५९ | १४९.९० |
| | | | |
| **६) सिंधुदुर्ग** | | | |
| १ | धामापूर, ता.मालवण, जि. सिंधुदुर्ग येथील पर्यटक निवासाचे श्रेणीवाढ करणे | १४३.९८ | ४३.१९ |
| २ | तारकर्ली, ता.मालवण जि. सिंधुदुर्ग येथील पर्यटक निवासाचे श्रेणीवाढ करणे | २३०.६१ | ६९.१८ |
| ३ | IISDA तारकर्ली, ता.मालवण जि. सिंधुदुर्ग येथील पर्यटक निवासाचे श्रेणीवाढ करणे | ३६१.४१ | १०८.४० |
| ४ | विजयदुर्ग, ता.देवगड जि. सिंधुदुर्ग येथील पर्यटक निवासाचे श्रेणीवाढ करणे | १२६.४० | ३७.९२ |
| | | | |
| **७) अहमदनगर** | शिर्डी , जि अहमदनगर येथील म.प.वि. महामंडळाच्या पर्यटक निवासाचे श्रेणीवाढ करणे | ४९९.०० | ५८.१२ |
| | | | |
| **८) मुंबई** | महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळाच्या डेक्कन ओडिसी ट्रेनचे पुनर्जीवन करणे | ४९९.८५ | १५०.०० |
| | | | |
| **९) नाशिक** | कन्वेंशन सेंटर अंतर्गत सजावट , वाहनतळ व इतर आनुषंगिक कामे. | ४०५.०० | १२१.५० |
| | | | |
| **१०) औरंगाबाद** | **अजिंठा व वेरुळ येथील अभ्यागत केंद्राचे पुनर्जीवनाचे काम करणे** | | |
| १ | अजिंठा अभ्यागत केंद्र पुनर्जीवनाचे काम | ४९५.०० | १४८.५० |
| २ | वेरूळ अभ्यागत केंद्र पुनर्जीवनाचे काम | ४९०.०० | १४७.०० |
| | **एकूण** | **५९३४.७०** | **१७८०.४१** |

२. <u>अटी व शर्ती</u> :-

1) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे पालन करण्यात यावे.

2) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई यांची राहील व जादा खर्चा प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

३) मंजूर तरतुदीतून करावयाचा खर्च ३१ मार्च, २०२२ पर्यंत करण्यात यावा व मंजूर कामे तात्काळ पूर्ण करावीत.

४) पर्यटन विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून केलेल्या कामाच्या ठिकाणी सदर कामे पर्यटन विभागाने प्रादेशिक पर्यटन विकास योजनेअंतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या निधीमधून केली असल्याबाबतचे फलक लावण्यात यावेत.

५) ज्या संदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तीय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेणे आवश्यक आहे.

६) अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र ५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/ प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा, दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

७) तांत्रिक मान्यता विहित स्तरावर घेण्यात यावी.

८) सदर निधीतून करावयाच्या कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास व पर्यटन संचालनालयास न चुकता सादर करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास व पर्यटन संचालनालयास सादर करण्यात यावे.

९) उपरोक्त कामांसाठी महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई ही कार्यान्वयीन यंत्रणा राहील.

१०) सदर काम पूर्ण झाल्यानंतर सदर कामाच्या देखभालाची तसेच इतर अनुषंगिक कामांची जबाबदारी कार्यान्वयीन यंत्रणा व संबंधित संस्था यांची राहील.

३. वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २०२१-२२ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून मुख्यलेखाशीर्ष "मागणी **क्रमांक झेडडी-४, ३४५२-पर्यटन, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरीता अनुदाने (३४५२ १९५८) ३१ सहायक अनुदान"** या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. या प्रकरणी मंजूर करण्यात आलेल्या (प्रादेशिक पर्यटन योजनेंतर्गत) सहायक अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता मुख्य लेखा अधिकारी पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई यांना 'आहरण व संवितरण अधिकारी' व सह संचालक पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई यांना 'नियंत्रण अधिकारी' म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम त्यांनी अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथे देयके सादर करुन महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळास वितरीत करण्यात यावी. सदर कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल शासनास एक महिन्यात सादर करण्यात यावा.

४. प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक ६.०४.२०२१ आणि वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१ अन्वये देण्यात आलेल्या सूचनेनुसार व अधिकाराच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित

करण्यात येत असून वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक २४/०६/२०२१ च्या परिशिष्टामधील तपासणीसूची बाबींची व अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्रमांक २३०/ व्यय -१५/दि. २२.०३.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३३०१६५८५०४५२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Ramesh
Jayaram Kadam

Digitally signed by Ramesh Jayaram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=931a917c29ea693ba9abee543d58bf1b6ade60ae69c9be92f59d232bb3a3fcc8, serialNumber=c8fbeb4e149e205d858dabb5d81a2a90a8deb719257572300ef79cfab47d9345, cn=Ramesh Jayaram Kadam
Date: 2022.04.13 16:10:20 +05'30'

**(र. ज. कदम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
३. महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई.
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
५. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. अधीदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई
७. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग (का.व्यय-१५/ अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव, (अर्थसंकल्प शाखा) पर्यटन व सांस्कृतिक विभाग,मंत्रालय, मुंबई.(यांना आदेशात नमूद करण्यात आलेल्या नियंत्रण अधिकारी, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या ZD००१२ या नियंत्रण सांकेतांकावर निधी वितरीत करण्याच्या विनंतीसह)
११. निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

***